**मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई यांच्या अंतर्गतच्या अनुसूचित जमातीचे जातीदावे अवैध ठरलेल्या अधिकारी / कर्मचारी यांची अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०१९/प्र.क्र.९५/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दि. २९ सप्टेंबर, २०२०

**संदर्भ** : १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२०

**प्रस्तावना -:**

माननीय सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपिल क्र. ८९२८/२०१५ (चेअरमन ॲन्ड मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरूध्द जगदिश बालाराम बहिरा व इतर) व इतर याचिका यामध्ये दि. ०६ जुलै, २०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही, असा निर्णय दिला आहे. सदर निर्णयाच्या अनुषंगाने माननीय उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्र. ३१४०/२००८ मध्ये दि. २८ सप्टेंबर, २०१८ च्या आदेशान्वये सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दि. ३१ डिसेंबर, २०१९ पर्यंत कार्यवाही करण्याचे आदेश दिले आहेत. त्यानुषंगाने उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेता, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेले, अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यानंतर विशेष मागास प्रवर्गाचे अथवा अन्य कोणत्याही मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले अधिकारी / कर्मचारी, अनुसूचित जमातीचा दावा सोडून दिलेले अधिकारी / कर्मचारी तसेच ज्या अधिकारी व कर्मचा-यांनी त्यांचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरविण्याच्या जात पडताळणी समितीच्या निर्णयाच्या विरोधात माननीय न्यायालयात याचिका दाखल केल्या असतील, मात्र त्यांच्या प्रकरणी माननीय उच्च न्यायालयाने किंवा माननीय सर्वोच्च न्यायालयाने जात प्रमाणपत्र अवैध ठरविण्याच्या समितीच्या निर्णयास स्थगिती दिली नसेल असे अधिकारी व कर्मचारी यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आल्या असल्याने, त्यासाठीची अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्र. १ व २ या शासन निर्णयांमधील तरतुदींच्या अधीन राहून सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्या अंतर्गतच्या प्रपत्र 'अ' व प्रपत्र 'ब' मध्ये नमूद अधिकारी / कर्मचारी यांच्या सेवा अधिसंख्य पदांवर वर्ग करण्यात आल्याने त्यासाठीची आवश्यक अकरा अधिसंख्य पदे निर्माण करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर अकरा अधिसंख्य पदे तात्पुरत्या स्वरूपात अकरा महिन्यांकरिता किंवा सदर अधिकारी / कर्मचारी सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यांपैकी जे आधी घडेल त्या कालावधीपर्यंत निर्माण करण्यात येत आहेत.

२. अधिसंख्य पदाच्या वेतनावर होणारा खर्च हा संबंधित अधिकारी / कर्मचारी सध्या ज्या कार्यालयात कार्यरत आहे, त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधिच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. बीसीसी २०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९ व क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२० रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००९२९१२२४०६८३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nisha Manohar Mahajan

Digitally signed by Nisha Manohar Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9a9f1749dec86c69520dc99c8a73d64e830153ee031b1b93c743e21a94cd3e93, cn=Nisha Manohar Mahajan
Date: 2020.09.29 12:25:12 +05'30'

**( नि. म. महाजन )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत**-१. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री (सा.बां.) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद यांचे खाजगी सचिव
३. अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२.
४. सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
५. प्र. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग,मुंबई.
९. सर्व सह सचिव / उप सचिव सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, वान्द्रे (पूर्व), मुंबई.
१३. कार्यासन सेवा-४, सार्वजनिक बां धकाम विभाग.
१४. कार्यासन प्रशासन-१, सार्वजनिक बांधकाम विभाग, (निवडनस्ती).

सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. ईएसटी-२०१९/प्र.क्र.९५/प्रशासन-१ दि. २९ सप्टेंबर, २०२० सोबतचे सहपत्र.

# प्रपत्र अ

मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्या अंतर्गतच्या अधिकारी व कर्मचा-यांनी अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याच्या कारणास्तव निर्माण करावयाची अधिसंख्य पदे

| अ. क्र. | अधिकारी / कर्मचा-याचे नाव | पदनाम व गट | नियुक्तीचा दिनांक | अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात आल्याचा दिनांक | अधिसंख्य पदावर देण्यात येणारे मासिक वेतन |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. रविंद्र विठ्ठल काटवे | तारतंत्री, गट-क | १४.१२.१९८९ | ३१.१२.२०१९ | रू. ५१३४२/- |
| २ | श्री. हरिश्चंद्र लखमा गुणाजी | वरिष्ठ लिपिक, गट-क | १२.१२.१९८९ | ३१.१२.२०१९ | रू.६२४४४/- |
| ३ | श्री. प्रेमनाथ हरिश्चंद्र अंबाजी | तारतंत्री, गट-क | १८.१२.१९८९ | ३१.१२.२०१९ | रू.४५६३०/- |
| ४ | श्री. कमलेश ना. निखारे | वरिष्ठ लिपिक, गट-क | १६.०४.१९८५ | ३१.१२.२०१९ | रू.५९८६०/- |
| ५ | श्री. हरिश्चंद्र दौलत बुरडे | कनिष्ठ लिपिक टंकलेखक, गट-क | २९.०७.१९९१ | ३१.१२.२०१९ | रू. ६१५६८/- |
| ६ | श्री. सुंदर महादेव होके | कनिष्ठ लिपिक टंकलेखक, गट-क | ०३.०१.१९९६ | ३१.१२.२०१९ | रू. ४३७२०/- |
| ७ | श्री. रमाकांत ता. पारधे | शिपाई, गट-ड | १३.१२.१९८९ | ३१.१२.२०१९ | रू.४६५८२/- |
| ८ | श्री. पांडुरंग गोविंद दोरकुळकर | पंपपरिचर, गट-ड | १६.०७.१९९० | ३१.१२.२०१९ | रू.४५१२२/- |
| ९ | श्री. नाना देवराम सोनवणे | मजदूर, गट-ड | ०९.१०.१९९१ | ३१.१२.२०१९ | रू.४०४५०/- |

सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. ईएसटी-२०१९/प्र.क्र.९५/प्रशासन-१
दि. २९ सप्टेंबर, २०२० सोबतचे सहपत्र.

## प्रपत्र-ब

मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्या अंतर्गतच्या अधिकारी व कर्मचा-यांनी अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याच्या कारणास्तव यापूर्वी सेवा समाप्त करण्यात आल्याने निर्माण करावयाची अधिसंख्य पदे

| अ. क्र. | अधिकारी / कर्मचा-याचे नाव | पदनाम व गट | नियुक्तीचा दिनांक | सेवा समाप्त करण्यात आल्याचा दिनांक | अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात आल्याचा दिनांक | अधिसंख्य पदावर देण्यात येणारे मासिक वेतन |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. प्रदिपसिंग छ. चंदेल | अनुरेखक, गट-क | २५.०३.१९८७ | ३१.०७.२०१७ | ३१.१२.२०१९ | रू.७५,५००/- |
| २ | श्री. अजय राजेश्वर नंदनवार | मजदूर, गट-ड | १७.०५.२००३ | ०५.०१.२००७ | ०६.०२.२०२० | रू.३५,१५०/- |